शासन शुध्दीपत्रक-शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील पीपीपी योजनेंतर्गत उपलब्ध जागांवर तसेच खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये केंद्रीय ऑनलाईन पध्दतीने प्रवेश घेणाऱ्या सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास व खुल्या प्रवर्गातील (आर्थिकदृष्टया दुर्बल घटक) विद्यार्थ्यांकरीता "व्यवसाय प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती" योजनेस मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,
शासन शुद्धीपत्रक क्रमांक : आयटीसी-२२१७/प्र.क्र.९९/व्यशि-३,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ सप्टेंबर, २०२१.

वाचा :-

१. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. आयटीसी-२२१७/प्र.क्र.९९/व्यशि-३ दिनांक:- २९ मे, २०१९
२. शासन निर्णय क्रमांक, सामान्य प्रशासन विभाग, राआधो-४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दि.१२.०२.२०२१
३. शासन निर्णय क्रमांक, सामान्य प्रशासन विभाग, राआधो-४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दि.३१.०५.२०२१

शासन शुद्धीपत्रक :-

शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील पीपीपी योजनेंतर्गत उपलब्ध जागांवर तसेच खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधून शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेंतर्गत अभ्यासक्रमांसाठी केंद्रीय ऑनलाईन पध्दतीने प्रवेश घेणाऱ्या सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास आणि खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना सन २०१९-२० प्रवेश सत्रापासून प्रशिक्षण शुल्क प्रतिपुर्तीचा लाभ देण्यासाठी व्यवसाय प्रशिक्षण शुल्क प्रतीपूर्ती योजनेस शासन निर्णय दि.२९मे, २०१९ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ३१२३/२०२० (एसएलपी (सी) नं. १५७३७/२०१९) प्रकरणी दिनांक ०५ मे, २०२१ रोजीच्या अंतिम आदेशान्वये सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास (SEBC) आरक्षण अवैध ठरविल्याने सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास (SEBC) प्रवर्गातील उमेदवारांना मागासवर्ग आरक्षण लागू नाही. त्यामुळे सदर उमेदवार हे अराखीव पदांच्या लाभासाठी अनुज्ञेय आहेत. सबब सदर उमेदवार जर दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच दिनांक ३१ मे, २०२१ च्या शासननिर्णयानुसार खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटक आरक्षणाच्या लाभासाठी पात्रतेबाबतच्या निकषांची पूर्तता करीत असतील तर त्यांना आर्थिक दुर्बल घटक १०% आरक्षणाचा लाभ अनुज्ञेय आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय दि.२९ मे, २०१९ मध्ये सुधारणा करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन शुध्दीपत्रक खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे :-**

१. सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास (SEBC) प्रवर्गातील उमेदवार जर सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२ फेब्रुवारी, २०१९ व दिनांक ३१ मे, २०२१ च्या शासन निर्णयानुसार खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक आरक्षणेच्या लाभासाठी पात्रतेबाबतच्या निकषांची पूर्तता करत असतील तर त्यांना आर्थिक दुर्बल घटक १०% आरक्षणाचा लाभ अनुज्ञेय आहे.

२. सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षामध्ये सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास (SEBC) प्रवर्गातील प्रवेशित व्दितीय वर्षाच्या व सन २०२०-२१ मध्ये प्रवेशित सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास (SEBC) विद्यार्थ्यांना प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती देण्यात येईल.

३. सन २०२१-२२ मध्ये प्रवेश घेणाऱ्या सामाजिक व शैक्षणिक दृष्टया मागास (SEBC) विद्यार्थ्यांना सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक १२ फेब्रुवारी, २०१९ व दिनांक ३१ मे, २०२१ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार आर्थिकदृष्टया दुर्बल (EWS) प्रवर्गाचे लाभ देण्यात येतील.त्याकरीता आर्थिकदृष्टया दुर्बल घटकात मोडत असल्याबाबत सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले विहित नमुन्यातील प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

४. सन २०२१-२०२२ पासून प्रवेश घेणाऱ्या सर्व खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील (EWS) विद्यार्थ्यांना आर्थिकदृष्टया दुर्बल घटकात मोडत असल्याबाबत सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले विहित नमुन्यातील प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

५. तसेच संदर्भ क्र. १ येथील दिनांक २९ मे, २०१९ च्या शासननिर्णयामधील मुद्दा क्र. ३ मधील ८ मध्ये शासन शुध्दीपत्रक सदर योजनेचा लाभ हा कुटुंबातील केवळ दोन अपत्यांपर्यंत मर्यादित राहील.

**याऐवजी**

सदर योजनेचा लाभ हा कुटुंबातील केवळ पहिल्या दोन अपत्यांपर्यंत मर्यादित राहील, तिसऱ्या व त्यापुढील कुटुंबातील अपत्याला सदर योजनेचा लाभ अनुज्ञेय असणार नाही. सदरबाबत लाभ मंजूर करणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी शिधावाटप पत्रिका किंवा अन्य शासनमान्य कागदपत्रांची पडताळणी करुन खात्री करावी, तसेच याबाबत पालकांचे हमीपत्र घेण्यात यावे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२१०९०९११०८२४६६०३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinod S Bondre

Digitally signed by Vinod S Bondre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=eOffice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12c7f1f38ac4843c1097ae135afa734591db9c7fc1f0b1e67c1629a13aa401e, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod S Bondre
Date: 2021.09.09 11:09:47 +05'30'

**(विनोद बोंदरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास व उदयोजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई,
११. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
१२. उपसंचालक, विभागीय मुख्यालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१३. सह/ उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय, मुंबई
१४. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय संचालनालयामार्फत
१५. प्राचार्य, शासकीय औदयोगिक प्रशिक्षण संस्था (सर्व)
१६. निवडनस्ती.